राज्यातील सर्व जिल्हाधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्याशी संबंधित विषयांबाबत मंत्रालयीन सचिव स्तरावरून एकत्रितपणे दूरचित्रवाणी परिषद आयोजित करण्याबाबत सूचना...

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण-१५१८/प्र.क्र.६७/लोकशाही दिन,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १४ नोव्हेंबर, २०१८

**प्रस्तावना :-**

मंत्रालयीन सचिव स्तरावरुन विविध विषयांबाबत विविध दिनांकास दूरचित्रवाणी परिषदा (Video Conferencing) आयोजित करण्यात येत असून, या दूरचित्रवाणी परिषदांकरिता जिल्हाधिकारी किंवा मुख्य कार्यकारी अधिकारी यांना उपस्थित रहावे लागते. त्यामुळे या अधिकाऱ्यांचे त्यांच्या कार्यक्षेत्रातील अत्यावश्यक नियोजित/तातडीचे दौरे प्रभावित होतात. त्याचप्रमाणे मुख्य कार्यकारी अधिकारी यांना विविध वैधानिक सभांना उदा. जिल्हा परिषद सर्वसाधारण सभा इ. उपस्थित राहावे लागते. तथापि या वेळोवेळी होणाऱ्या दूरचित्रवाणी परिषदांमुळे यामध्ये व्यत्यय निर्माण होतो. याकरिता सर्व मंत्रालयीन विभागांमार्फत मंत्रालयात आयोजित करण्यात येणाऱ्या **जिल्हाधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्याशी संबंधित दूरचित्रवाणी परिषदा** वेगवेगळया दिनांकास आयोजित न करता, एकत्रितपणे दूरचित्रवाणी परिषद आयोजित करण्याच्या दृष्टीने कार्यपध्दती निश्चित करणे व यासंदर्भात सर्वसमावेशक सूचना देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :-**

राज्यातील सर्व जिल्हाधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्याशी संबंधित विषयांबाबत मंत्रालय स्तरावर एकत्रितपणे दूरचित्रवाणी परिषद आयोजित करण्याबाबत खालीलप्रमाणे कार्यपध्दती व सर्वसमावेशक सूचना देण्यात येत आहेत :-

१) सर्व मंत्रालयीन विभागांना त्यांच्याशी संबंधित विषयांबाबत जिल्हाधिकारी अथवा मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्याशी चर्चा करणे, सूचना देणे, आढावा घेणे, माहिती घेणे इ. याद्दष्टीने दूरचित्रवाणी परिषद आयोजित करण्याकरिता प्रत्येक महिन्याचा दुसरा व चौथा गुरुवार हे दिवस निश्चित करण्यात येत आहेत. **या दिवशी सार्वजनिक सुट्टी असल्यास अथवा काही अपरिहार्य कारणास्तव त्या दिवशी दूरचित्रवाणी परिषद होणे शक्य नसल्यास सदर दूरचित्रवाणी परिषद पुढील कामकाजाच्या दिवशी आयोजित करण्यात येईल.**

२) **सदर एकत्रित दूरचित्रवाणी परिषदेचे कामकाज प्रत्येक महिन्याच्या दुसऱ्या व चौथ्या गुरुवारी सकाळी ११.०० वाजल्यापासून मा. मुख्य सचिव यांचे समिती कक्ष, ६ वा मजला, मुख्य इमारत, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ येथे सुरु राहील.**

३) सदर दूरचित्रवाणी परिषद मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली होईल. जर काही कारणास्तव मा .मुख्य सचिवांना उपस्थित राहणे शक्य नसेल तर सदर दूरचित्रवाणी परिषद विषयानुरूप संबंधित प्रशासकीय विभागाचे सचिव यांच्या अध्यक्षतेखाली होईल.

४) सदर दूरचित्रवाणी परिषदेचे इतिवृत्त/ निर्णय/ सूचना इ. बाबी संबंधित विभागाच्या सचिवांमार्फत निर्गमित करण्यात येतील.

५) प्रत्येक प्रशासकीय विभागाने सदर दूरचित्रवाणी परिषदेमध्ये घ्यावयाच्या विषयांची यादी, त्यासाठी आमंत्रित करावयाच्या अधिकाऱ्यांची यादी व आवश्यक असलेला कालावधी याची माहिती पत्राद्वारे आयोजित दूरचित्रवाणी परिषदेच्या अगोदरच्या शनिवारपर्यंत लोकशाही दिन कक्ष (सा.प्र.वि.) यांना सादर करावी. सदर पत्राची सॉफ्ट कॉपी (मायक्रोसॉफ्ट वर्ड फाईल, सकल मराठी फॉन्ट आणि फॉन्ट साईझ-११) लोकशाही दिन कक्षाच्या lokshahidin.gad@maharashtra.gov.in ह्या ई-मेल आयडी वर पाठविण्यात यावी.

६) विविध प्रशासकीय विभागांकडून प्राप्त झालेल्या माहितीच्या आधारे प्रशासकीय विभागनिहाय दूरचित्रवाणी परिषदेचे वेळापत्रक अगोदरच्या सोमवारपर्यंत तयार करण्याची कार्यवाही सामान्य प्रशासन विभागातील लोकशाही दिन कक्ष यांचेमार्फत करण्यात येईल. सदर वेळापत्रकामध्ये दूरचित्रवाणी परिषदेमध्ये घ्यावयाचे विषय व आमंत्रित करावयाच्या अधिकाऱ्यांची यादी, विभागनिहाय लागणार वेळ इ. बाबत माहिती असेल. सदर कार्यवाही सामान्य प्रशासन विभागाच्या स्तरावर पूर्ण करण्यात येईल.

७) सदर वेळापत्रकाची प्रत संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभाग, मुख्य सचिव कार्यालय व माहिती व तंत्रज्ञान उपविभाग (दूरचित्रवाणी परिषदेसाठी आवश्यक तांत्रिक सहाय्य उपलब्ध करून देण्यासाठी) यांना आयोजित दूरचित्रवाणी परिषदेच्या अगोदरच्या सोमवारपर्यंत सामान्य प्रशासन विभागातील लोकशाही दिन कक्ष यांचेमार्फत पाठविण्यात येईल.

८) लोकशाही दिन कक्ष यांचेमार्फत प्राप्त झालेल्या एकत्रित दूरचित्रवाणी परिषदेच्या वेळापत्रकाची प्रत मुख्य सचिव कार्यालयामार्फत महाराष्ट्र ई-समिक्षा प्रणालीद्वारे संबंधित जिल्हाधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी यांना पाठविण्यात येईल.

९) जिल्हाधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी याव्यतिरिक्त अन्य क्षेत्रिय अधिकारी यांनी सदर दूरचित्रवाणी परिषदेस उपस्थित रहाणे आवश्यक असल्यास संबंधित जिल्हाधिकारी यांनी संबंधिताना तशा सूचना निर्गमित कराव्यात.

१०) संबंधित जिल्हाधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी एकत्रित दूरचित्रवाणी परिषदेकरिता त्यांच्या कार्यालयातील दूरचित्रवाणी परिषद दालनामध्ये उपस्थित रहावे. तसेच संबंधित क्षेत्रिय यंत्रणांचे अधिकारी (ज्यांचा वेळापत्रकामधील आमंत्रितांच्या यादीत समावेश आहे) यांची बसण्याची व्यवस्था त्यांच्या कार्यालयातील दूरचित्रवाणी परिषद दालनात करावी.

११) सर्व जिल्हाधिकारी व सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी महाराष्ट्र ई-समिक्षा करीता नोडल अधिकारी नियुक्त करावा व त्याबाबतच्या आदेशात संबंधित अधिकाऱ्यांचे संपूर्ण नाव, पदनाम व संपर्क क्रमांक, ई-मेल आयडी, त्याच्या कार्यालयाचे नाव इ. नमूद करावे. या आदेशाची प्रत मा.मुख्य सचिव कार्यालयास उपलब्ध करुन द्यावी. सदर नोडल अधिकारी मंत्रालय दूरचित्रवाणी परिषदेची अनुषंगिक कामे पार पाडतील.

१२) सदर वेळापत्रकानुसार आमंत्रित अधिकारी दूरचित्रवाणी परिषदेस उपस्थित राहतील व विहीत केलेल्या वेळेतच परिषद संपेल याची दक्षता संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभाग आणि संबंधित जिल्हाधिकारी / मुख्य कार्यकारी अधिकारी घेतील.

**१३)** माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई व राष्ट्रीय सूचना केंद्र, मुंबई यांनी दूरचित्रवाणी परिषदेच्या दिवशी सकाळी ११.०० वाजल्यापासून ते दूरचित्रवाणी परिषदेचे कामकाज समाप्त होईपर्यत दूरचित्रवाणी परिषदेकरिता आवश्यक सुविधा उपलब्ध होतील याची दक्षता घ्यावी. तसेच राष्ट्रीय माहिती केंद्राचे जिल्हा कार्यालय आणि जिल्हाधिकारी कार्यालयातील दूरचित्रवाणी परिषदेची व्यवस्था पाहणारे संबंधित अधिकारी/कर्मचारी यांनी त्यांच्या कार्यालयातील दूरचित्रवाणी परिषदेची सर्व व्यवस्था परिपूर्ण ठेवण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही करावी.

**१४)** जर मंत्रालयीन प्रशासकीय विभागास एखाद्या अतिमहत्वाच्या विषयाकरिता उक्त नियोजित दिवसांखेरीज तातडीने जिल्हाधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या समवेत दूरचित्रवाणी परिषद आयोजित करणे आवश्यक असेल, तर अशा प्रकरणी त्या मंत्रालयीन प्रशासकीय विभागास मा.मुख्य सचिव यांच्या सहमतीने तातडीची दूरचित्रवाणी परिषद आयोजित करता येईल.

**१५)** उक्त कार्यपध्दती मा.मुख्यमंत्री महोदय, इतर मंत्री महोदय व केंद्र शासनाचे अधिकारी इ. यांचे अध्यक्षतेखाली होणाऱ्या दूरचित्रवाणी परिषदा तसेच मंत्रालयीन प्रशासकीय विभागाच्या अधिनस्त क्षेत्रीय कार्यालये व अन्य कार्यालयांशी संबंधित दूरचित्रवाणी परिषदांकरिता लागू नसेल.

२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक सांकेतांक २०१८१११४१४५९२३३१०७ असा आहे. तसेच सदर परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHIVAJI RAGHUNATH DAUND

Digitally signed by SHIVAJI RAGHUNATH DAUND
DN: CN = SHIVAJI RAGHUNATH DAUND, C = IN, S = MAHARASHTRA, O = Personal
Date: 2018.11.14 15:35:22 +05'30'

**( शिवाजी दौंड )**
**सचिव, प्र.सु.र.व का.**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव. मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. सर्व जिल्हाधिकारी
६. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी
७. निवड नस्ती.